**विधानसभांच्या सार्वत्रिक निवडणूका-२०१४ करिता त्या क्षेत्रातील दुकाने, आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्नगृहे, नाट्यगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापना तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या, शॉपिंग सेंटर्स, मॉल्स, रिटेलर्स इत्यादि अस्थापनांमध्ये कार्यरत असलेल्या कामगारांना मतदानाच्या दिवशी मतदान करण्यासाठी सूट्टी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः विसानी -२०१४/प्र.क्र.१३२/काम-९,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
तारीख: १० ऑक्टोबर, २०१४.

वाचा -

**भारतीय निवडणूक आयोगाची No. ECI/PN/४३/२०१४ दिनांक - १२ सप्टेंबर, २०१४ ची प्रेस नोट**

**शासन परिपत्रक-**

भारत निवडणूक आयोगाने महाराष्ट्र राज्यातील २८८ विधानसभा मतदार संघात सार्वत्रिक निवडणूका बुधवार दिनांक १५ ऑक्टोंबर, २०१४ रोजी घेण्याचे ठरविले आहे.

२. महाराष्ट्र राज्यातील २८८ विधानसभा मतदार संघ क्षेत्रात मतदानाचा हक्क बजावण्याची योग्य संधी प्राप्त करुन देण्याच्या दृष्टीने या क्षेत्रात असलेल्या मतदारांना मतदानाच्या दिवशी मतदान करण्यासाठी सुट्टी देण्याबाबत सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-३३) कडून कळविण्यात आले आहे. सदरहू दिनांकास लोकप्रतिनिधित्व अधिनियम, १९५१ (भाग-२) मधील नियम १३५ (ब) (१ ते ३) नुसार ज्या व्यक्तींना लोकसभा किंवा राज्याच्या विधानसभेसाठी मतदानाचा हक्क आहे व ज्या व्यवसाय, ट्रेड, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापना यामध्ये रोजगारीत आहेत त्यांना मतदानाच्या दिवशी सार्वजनिक सूट्टी घोषित करणे आवश्यक आहे तसेच सदर सूट्टीसाठी कोणतीही वजाती किंवा कपात करता येणार नाही.

३. लोकप्रतिनिधित्व अधिनियम, १९५१ (भाग-२) मधील नियम १३५ (ब)(१ ते ३) अन्वये राज्यातील विधानसभा सार्वत्रिक निवडणूकीच्या पार्श्वभूमीवर महाराष्ट्र राज्यातील विविध आस्थापना, दुकाने आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, अन्नगृहे, नाट्यगृहे, व्यापार, औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापना तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या, शॉपिंग सेंटर्स, मॉल्स, रिटेलर्स इत्यादि अस्थापना यांना सूचना देण्यात येत आहेत की, खालील नमूद केलेल्या विधानसभा मतदार संघ क्षेत्रातील त्यांच्या समोर दर्शविलेल्या निवडणूकीच्या दिवशी कामगारांना मतदानाचा हक्क बजावण्यासाठी सार्वजनिक सूट्टी देण्यात यावी.

| मतदानांचा दिनांक | विधानसभा मतदारसंघ |
|---|---|
| बुधवार, दिनांक १५ ऑक्टोंबर, २०१४ | २८८ विधानसभा मतदारसंघ (महाराष्ट्र राज्य) |

४. लोकप्रतिनिधित्व अधिनियम, १९५१ (भाग-२) मधील नियम १३५ (ब) (४) नुसार मतदानाच्या दिवशी कामगारांच्या अनुपस्थितीमुळे धोका अथवा मोठ्या प्रमाणावर नुकसान होईल अशा अस्थापनेतील / उद्योगातील कामगार मतदारांना मतदानाचा हक्क बजावण्यासाठी संपूर्ण दिवसाची सुट्टी देता येणे शक्य नसल्याने अशा आस्थापनेतील /उद्योगातील कामगारांना तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या, निर्यात व्यवसायात असलेल्या कंपन्या, कायम / अखंडीत उत्पादन सुरु असलेल्या कंपन्यातील ( Continuous process Industries ) कामगारांना मतदानांचा हक्क बजावण्यासाठी किमान दोन तासांची किंवा त्यांना मतदानांचा हक्क बजावता येईल अशा पुरेशा वेळेची सवलत देण्यात यावी.

५. वर नमुद केलेल्या विधानसभा मतदार संघ क्षेत्रातील सर्व दुकाने, आस्थापना, निवासी हॉटेल, खाद्यगृहे, नाट्यगृहे, व्यापार औद्योगिक उपक्रम किंवा इतर आस्थापना तसेच माहिती तंत्रज्ञान कंपन्या, शॉपिंग सेंटर्स, मॉल्स, रिटेलर्स, निर्यात व्यावसायात असलेल्या कंपन्या इत्यादी आस्थापनांच्या मालक/ आस्थापनांनी वरील सुचनांचे काटेकोरपणे अनुपालन होईल, यांची दक्षता घ्यावी.

६. सदर शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभागाच्या नस्ती क्र. सीईए-२०१४/प्र.क्र.१३६७/१४/३३, दिनांक २४/०९/२०१४ च्या सूचनेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४१०१०१२४०१०४८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digambar Sonusing Rajput

Digitally signed by Digambar Sonusing Rajput
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry Energy & Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Digambar Sonusing Rajput
Date: 2014.10.10 13:19:03 +05'30'

( दि. सो. राजपूत )
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रत,

१. प्रधान सचिव (कामगार) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०००३२
२. प्रधान सचिव (उद्योग) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०००३२
३. प्रधान सचिव (ऊर्जा) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०००३२
४. प्रधान सचिव व मुख्य निवडणूक अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. सचिव, राज्य निवडणूक आयोग, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई.
६. महासंचालक, माहिती व जनसंपर्क, महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.
७. कामगार आयुक्त, वांद्रे (पूर्व), मुंबई.

८. विकास आयुक्त (असंघटीत कामगार ), मुंबई.
९. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, वांद्रे (पूर्व), मुंबई.
१०. संचालक, बाष्पके, संचालनालय, वांद्रे (पूर्व), मुंबई.
११. संचालक, कै. नारायण मेघाजी लोखंडे, महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, परेल, मुंबई.
१२. कल्याण आयुक्त, महाराष्ट्र कामगार कल्याण मंडळ, एलफिन्स्टन रोड, मुंबई.
१३. सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई.
१४. विभागीय आयुक्त,(मुंबई, नाशिक, पुणे, अमरावती, औरंगाबाद व नागपूर).
१५. सर्व जिल्हाधिकारी.
१६. सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
१७. उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालये / मंडळे इत्यादी.
१८. उद्योग, ऊर्जा व कामगार विभागातील सर्व कार्यासने.
१९. निवडनस्ती (कामगार-९).